अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील सहसंचालक, गट-अ संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सन-२०२५ या वर्षातील सर्वसाधारण बदल्यांबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन आदेश क्रमांक- बदली-१०२५/प्र.क्र.४९/का.१४२७**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
विस्तार इमारत, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ६/६/२०२५.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ चे कलम ४(१) ते ४(३) मधील तरतुदीनुसार अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील सहसंचालक, गट-अ (S-२५: ७८८००-२०९२००) या संवर्गातील खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांची सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने बदली करण्यात येत असून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक-३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | बदलीपात्र अधिकाऱ्यांचे नाव, सध्याचे पदनाम व कार्यालय | बदलीने द्यावयाच्या पदस्थापनेचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|
| (१) | (२) | (३) |
| १ | श्रीमती रु. प्र. थोते,<br>सहसंचालक,<br>अर्थ व सांख्यिकी संचालनालय,<br>मुख्य कार्यालय, मुंबई | सहसंचालक (इ. आ. सं. कें.),<br>अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुख्य कार्यालय, मुंबई.<br>(श्रीमती नाईक यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर.) |
| २ | श्रीमती उ. ग. नाईक,<br>सहसंचालक (इआसकें),<br>अर्थ व सांख्यिकी संचालनालय,<br>मुख्य कार्यालय, मुंबई. | सहसंचालक,<br>पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग,<br>मंत्रालय, मुंबई.<br>(रिक्त पदावर) |
| ३ | श्रीमती सी. प्र. जोशी,<br>सहसंचालक,<br>अर्थ व सांख्यिकी संचालनालय,<br>प्रादेशिक कार्यालय, कोकण-नवी मुंबई. | विशेष कार्य अधिकारी,<br>विभागीय आयुक्तांचे कार्यालय<br>(तीर्थक्षेत्र विकास कक्ष), पुणे.<br>(रिक्त पदावर) |

२. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमानुसार अनुज्ञेय पदग्रहण अवधीतच, बदली झालेल्या अधिकारी यांनी बदलीच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदग्रहण अवधीत बदलीच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (Dies Non) म्हणून गणला जाईल.

३.  महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ च्या तरतुदी लक्षात घेता, उपरोक्त बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांच्या बदलीनंतरच्या पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

४.  नियोजन विभागाचे या शासन आदेशान्वये उपरोक्त तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांची बदली प्रशासकीय कारणास्तव करण्यात येत असल्याने त्यांना नियमानुसार अनुज्ञेय असणारा पदग्रहण अवधी, प्रवासभत्ता व दैनिक भत्ता देय राहील. तसेच या शासन आदेशान्वये उपरोक्त तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांना या आदेशाच्या दिनांकापासून कार्यमुक्त करण्यात येत आहे. उपरोक्त तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांनी पदभार सोडल्याचा तसेच स्वीकारल्याचा दिनांक त्वरीत कक्ष अधिकारी, नियोजन विभाग यांना **balaso.gaikwad@nic.in** या ई-मेल पत्त्यावर तसेच आयुक्त, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई यांना कळवावा.

५.  महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन आदेश उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०६०६१६५८२८४४१६ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

LATIKA VIVEK PATIL

Digitally signed by LATIKA VIVEK PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=1c4b49a56ff92b0c2302bfbfa5229e6a2bbc1d7ad665186f2cdb07c85b6d7f5e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F2E420294905BF4B07C5FF20F3668B9BBE325263C711E71C8BEC3DF7BA0D8A19, cn=LATIKA VIVEK PATIL
Date: 2025.06.06 16:59:36 +05'30'

**(लतिका वि. पाटील)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उपमुख्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र राज्य विधान परिषद / विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
५) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र- १, मुंबई.
६) विभागीय आयुक्त, पुणे.
७) आयुक्त, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
८) उपसचिव (आस्थापना), पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्तांचे कार्यालय (सर्व)
१०) सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, प्रादेशिक कार्यालये (सर्व)
११) उपसंचालक (प्रशासन), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
१२) अधिदान व लेखाधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
१३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे / ठाणे.
१५) संबंधित अधिकारी ( अर्थ व सांख्यिकी संचालनालय,मुंबई यांचे मार्फत)
१६) अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१७) निवडनस्ती.